राज्यातील सीसीटीएनएस प्रकल्पाच्या देखभाल, दुरुस्ती व इतर आवश्यक बाबींकरीता प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक : सीसीटीएनएस-३६१५/प्र.क्र.२०२/पोल-३,
मंत्रालय, २ रा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २२ सप्टेंबर, २०२०

वाचा :- १) गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक:- एमआयएस ०५०८/७४८/प्र. क्र.३२९/पोल-४, दि.२२.५.२००९.
२) पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे अध्यक्षतेखालील SEC (State Empowered Committee) समितीच्या दि. ४.७.२०१६ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त,
३) अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखालील दि.१२.७.२०१६ व दि.२८.१२.२०१६ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
४) मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील राज्य शिखर समितीच्या दि. १७.१.२०१७ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
५) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५
६) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि.१६.०४.२०२०
७) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. संकीर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दि.२९.०५.२०२०
८) अपर पोलीस महासंचालक (नि.व स.), पोलीस महासंचालक कार्यालय, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/१७/६१६२/सीसीटीएनएस प्रकल्प/१५/२०१०-२०, दि.२०.०७.२०२०
९) मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील राज्य शिखर समितीच्या दि.२०.०७.२०२० रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

प्रस्तावना :-

केंद्र शासनाच्या ई-गव्हर्नन्स योजनेअंतर्गत राज्यात सीसीटीएनएस प्रकल्प राबविण्यात येत आहे. सदर प्रकल्पातर्गत राज्यातील १०५४ पोलीस ठाणी व ६२९ वरिष्ठ पोलीस कार्यालये CAS (Core Application Software) सॉफ्टवेअरव्दारे जोडण्यात आली आहेत. सदर प्रकल्पाचे दि.१५.९.२०१५ रोजी सन्माननीय राज्यपाल महोदयांच्या हस्ते लोकार्पण पार पडले आहे. सीसीटीएनएस प्रकल्पांतर्गत जोडण्यात आलेल्या १०५४ पोलीस ठाणी व ६२९ वरीष्ठ कार्यालयामध्ये २ mbps नेटवर्क कनेक्टिव्हीटी उपलब्ध करुन देण्यात आली आहे. सदर प्रकल्प हा केंद्र पुरस्कृत होता परंतु मार्च २०१८ नंतर या

प्रकल्पास केंद्र शासनाकडून निधी प्राप्त होणार नाही, असे केंद्र शासनाने कळविले आहे. सबब सदर प्रकल्पाच्या देखभाल व दुरुस्तीसाठी व इतर आवश्यक बाबींकरीता येणारा खर्च राज्य शासनामार्फत करणे आवश्यक आहे.

अपर पोलीस महासंचालक, (नि. व स.), पोलीस महासंचालक कार्यालय, मुंबई यांनी दि.२०.०७.२०२० च्या पत्रान्वये CCTNS प्रकल्पासाठी सन २०१९-२० या वर्षाच्या प्रलंबित देयकांसाठी रु.२६,६७,१२,९३४/- व सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरिता (Non-CAS Application) साठी रु.१०८,३५,२३,१९४/- व पोलीस आधुनिकीकरण सन २०१९-२० करिता रु.२,७३,६५,०८६/- असा एकूण रु.१३७,७६,०१,२१४/- एवढा निधी उपलब्ध करुन देण्याबाबत विनंती केली होती. त्यानुसार मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षततेखालील राज्य शिखर समितीच्या (SAC) दि.२०.०७.२०२० रोजीच्या बैठकीत सन २०१९-२० या वर्षाच्या प्रलंबित देयकांसाठी रु.२६,६७,१२,९३४/- व सन २०२०-२१ या आर्थिक वर्षातील सीसीटीएनएस प्रकल्पाच्या देखभाल, दुरुस्ती व इतर आवश्यक बाबींकरीता रु.१४,८१,००,०००/- असे एकूण रु.४१,४८,१२,९३४/- एवढ्या खर्चास मान्यता देण्यात आली.

त्यानुसार वित्त विभागाने प्रलंबित देयकांसाठी रु.२६,६७,१२,९३४/- व सन २०२०-२१ या आर्थिक वर्षातील सीसीटीएनएस प्रकल्पाच्या देखभाल, दुरुस्ती व इतर आवश्यक बाबींकरीता रु.१४,८१,००,०००/- असे एकूण रु.४१,४८,१२,९३४/- एवढ्या खर्चास मंजूरी दिली आहे. सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय** :

सीसीटीएनएस प्रकल्पाच्या देखभाल व दुरुस्तीसाठी व इतर आवश्यक बाबींकरीता मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील राज्य शिखर समितीने (SAC) दिलेल्या मान्यतेनुसार प्रलंबित देयकांसाठी रु.२६,६७,१२,९३४/- व सन २०२०-२१ या आर्थिक वर्षातील सीसीटीएनएस प्रकल्पाच्या देखभाल, दुरुस्ती व इतर आवश्यक बाबींकरीता रु.१४,८१,००,०००/- असे एकूण रु.४१,४८,१२,९३४/- (रुपये एकेचाळीस कोटी अठ्ठेचाळीस लाख बारा हजार नऊशे चौतीस फक्त) एवढ्या खर्चास प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

२. उपरोक्त सन २०१९-२० या आर्थिक वर्षाच्या प्रलंबित देयकांसाठी तसेच सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात सीसीटीएनएस प्रकल्पाच्या देखभाल, दुरुस्ती व इतर आवश्यक बाबींसाठी येणारा खर्च "मागणी क्र.बी-१, २०५५-पोलीस, (००) १०९ जिल्हा पोलीस, (००) १४ गुन्हा व गुन्हेगारी माग काढण्यासाठी नेटवर्क यंत्रणा (राज्य योजना), दत्तमत, (२०५५ए०९७), ५२-यंत्रसामग्री व साधनसामग्री" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२०-२०२१ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३ मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली आयोजित करण्यात आलेल्या राज्य शिखर समितीच्या (SAC) दि.२०.०७.२०२० रोजीच्या बैठकीतील निर्णयानुसार तसेच अनौपचारीक संदर्भ क्र.३१८/२०२०/व्यय-७, दि.११.०९.२०२० अन्वये वित्त विभागाने दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००९२२१५४३०९३३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dinesh Appaji Saste

Digitally signed by Dinesh Appaji Saste
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a49495d0d4b31e36ff1d612a85453ca984b74e28fd6f99cdf66e3e499969e942, cn=Dinesh Appaji Saste
Date: 2020.09.22 15:45:43 +05'30'

**(दिनेश अ. सस्ते)**
**कार्यासन अधिकारी, गृह विभाग**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव
४. मा. राज्यमंत्री, गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव
५. मा. राज्यमंत्री, गृह (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव
६. मा. मुख्य सचिव यांचे सहसचिव
७. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
८. प्रधान सचिव (विशेष) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक

९. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ, वरळी, मुंबई.
११. अपर पोलीस महासंचालक (नि व स), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२. अपर पोलीस महासंचालक, राज्य गुन्हे अभिलेख कक्ष, गुन्हे अन्वेषण विभाग, पुणे.
१३. सह व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ, मुंबई.
१४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
१५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१७. प्रकल्प संचालक, मे. विप्रो प्रा.लि., मुंबई.
१८. वित्त विभाग, व्यय-७/ वित्तीय सुधारणा.
१९. कक्ष अधिकारी, अर्थ-१, गृह विभाग.
२०. निवडनस्ती, पोल-३